महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली
सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना
अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.
एस एस ४४८६१ डब्ल्यु मेजर कौस्तुभ
प्रकाशकुमार राणे जि. ठाणे.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०१८/प्र.क्र.३१०(३)/२८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: - २३ /०७/२०१८.

वाचा-

१) शासन निर्णय,सा. प्र. वि. क्र. मासैम-२०१६ /प्र. क्र. ९२(२)/२८, दिनांक ३०.११.२०१६
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/ गौ.पु /प्रस्ताव/ सैकवि-१६ / २३८०, दिनांक १०/०७/२०१८.

प्रस्तावना-

महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. एस एस ४४८६१ डब्ल्यु मेजर कौस्तुभ प्रकाशकुमार राणे यांना राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचना क्र.२१ प्रेस/२०१८, दिनांक २६ जानेवारी, २०१८ अन्वये" **सेना पदक**" हे पदक प्रदान करण्यात आले आहे. एस एस ४४८६१ डब्ल्यु मेजर कौस्तुभ प्रकाशकुमार राणे यांना रु. ६००,०००/- इतके अनुदान देण्याचा प्रस्ताव संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये सादर केला आहे.

शासन निर्णय-

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| | एस एस ४४८६१ डब्ल्यु मेजर कौस्तुभ प्रकाशकुमार राणे,<br>बी/९ हिरल सागर, शीतल नगर,मिरा रोड( पूर्व) ठाणे | **सेना पदक** | २६ जानेवारी,२०१८ | ६,००,०००/- |
| | | | **एकूण** | **६,००,०००/-** |

२ महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेअंतर्गत अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी ७५ % म्हणजे रु. ४,५०,०००/- ( रु. चार लाख पन्नास हजार फक्त) प्रमाणे शासकीय अनुदानातून तर उर्वरित २५ % रक्कम म्हणजे रुपये १,५०,०००/- ( रु. एक लाख पन्नास हजार हजार फक्त ) प्रमाणे मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रु.४३,५०,००,०००/- कोटी रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. ४,५०,०००/- (रुपये चार लाख पन्नास हजार फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाकरीता रु. २,०८,७०००/- (रुपये दोन कोटी आठ लाख ऐक्काहत्तर हजार फक्त( इतक्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,ठाणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.**सदरची रकक्म जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, ठाणे यांनी कोषागार कार्यालय, ठाणे येथून आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करण्यात यावी.**

५. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्यांची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, **क्र मासैम-२०१६ /प्र. क्र. ९२(२)/२८, दिनांक ३०.११.२०१६** मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२४१२२३४७५२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, serialNumber=032a6acbfd529d66dd76e26eab14b28c6dd07d2f776e529b44ba2cb45324c503, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2018.07.24 12:24:14 +05'30'

**( कि. म. जकाते )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, ठाणे,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, ठाणे,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
११. एस एस ४४८६१ डब्ल्यु मेजर कौस्तुभ प्रकाशकुमार राणे, बी/९ हिरल सागर, शीतल नगर, मिरा रोड (पूर्व) ठाणे- ४०११०७
१२. वित्त विभाग (व्यय ४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३. प्रत संग्रहार्थ.